**वित्तीय मान्यता**

**खरीप व रब्बी हंगाम २०२१ मध्ये युरिया खताचा संरक्षित साठा करण्यासाठी (Buffer Stock) आलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : युसंसा २०२१/प्र.क्र. ३९/१७-अे**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०००३२.**

**दिनांक :- १०/०३/२०२२**

वाचा:-

१. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/खते/ गुनि ३-४/ बफर/ २१-२२/ १०८५५/ २०२१, दि. १९/०३/२०२१.
२. कृषि विभागाचा शासन निर्णय क्रमांक: युसंसा २०२१/प्र.क्र. ३९/१७-अे, दि. १५/०४/२०२१.
३. कृषि आयुक्तालयाचे जा.क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/ बफर/ २१-२२/ १४०६२/ २१, दि. १९/०४/२०२१.
४. कृषि विभागाचे पत्र क्र. संकीर्ण १६२१/प्र.क्र. ३९/१७-अे, दि. २८/०४/२०२१
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. खते/ युसंसा/ २०२१-२२/००२२६, दि. १६/०४/२०२१
६. कृषि विभागाचे पत्र क्र. संकीर्ण १६२१/प्र.क्र. ३९/१७-अे, दि. ०७/०५/२०२१
७. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. युसंसा २०२१/प्र.क्र. ३९/१७-अे, दि. १२/०५/२०२१
८. कृषि आयुक्तालयाचे जा.क्र. कृआ / खते/ गुनि ३-४/ बफर/ २१-२२/ ७९२८/ २१, दि. २८/०२/२०२२
९. शासन निर्णय क्रमांक युसंसा २०२०/ प्र.क्र. ६९/१७-अे, दि. ८/४/२०२१

प्रस्तावना:

राज्यामध्ये खरीप हंगाम २०२१ मध्ये, राज्यातील शेतकऱ्यांना युरिया खताचा पुरवठा करण्यासाठी १.५० लाख मे. टन युरीया खताचा संरक्षित साठा करण्याचा निर्णय मंत्रिमंडळ उपसमितीच्या बुधवार दिनांक २४/०३/२०२१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आलेला आहे. सदर निर्णयास मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री आणि मा. मुख्यमंत्री महोदय यांची मान्यता घेण्यात आलेली आहे. सदर प्रयोजनार्थ महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ यांना संदर्भीय क्र. २ अन्वये आणि विदर्भ को-ऑप मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर यांना संदर्भीय क्र. ७ अन्वये “नोडल एजन्सी” म्हणून शासनाने नियुक्त केले आहे. त्यानुसार महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ व विदर्भ को- ऑप मार्केटिंग फेडरेशन लि. यांना युरिया खतांचा संरक्षित साठा करण्यास आलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

खरीप व रब्बी हंगाम २०२१ मध्ये राज्यातील शेतकऱ्यांना मागणीप्रमाणे व वेळेवर युरिया खतांचा पुरवठा करण्यासाठी युरीयाचा संरक्षित साठा करण्यासाठी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ आणि विदर्भ को- ऑप मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर यांना “नोडल एजन्सी” म्हणून नियुक्त करण्यात आले होते. त्यानुसार या दोन्ही संस्थांनी केलेला युरियाचा संरक्षित साठा व त्यासाठी आलेला खर्च खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | नोडल एजन्सी | संरक्षित करण्यात आलेला साठा (मे. टन) | युरिया खताचा संरक्षित साठा करण्यासाठी आलेला खर्च (रक्कम रुपयात) |
|---|---|---|---|
| १. | महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई | ७२२४२.६१० | ६,५३,६९,४४६ |
| २. | विदर्भ को- ऑप मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर | २०२१६.१८० | १,९८,२४,४३१ |
| | | **९२४५८.७९** | **८,५१,९३,८७७** |

खरीप हंगाम २०२० व रब्बी २०२०-२१ या हंगामात महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने ९०९६.२९५ मे. टन इतका युरिया संरक्षित साठा केलेला होता. सदर खर्च भागविताना दिनांक ८/०४/२०२१ च्या शासन निर्णयान्वये रु. ५५,१८,०००/- इतका निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्यात आलेला होता. सदर निधी पैकी रु. १,३८,३५४/- इतका निधी कृषि आयुक्तालयाकडे शिल्लक आहे. सदरचा शिल्लक निधी वरील संस्थांनी सादर केलेल्या एकूण रक्कमेमधून वजा करुन उर्वरित **रु. ८,५०,५५,५२३/- इतका निधी** कृषि आयुक्तालय, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्रमांक : डी-३
१०५, खते व रासायनिक खते,
(००) (३१) डीएपी व मिश्र रासायनिक खतांचा पुरवठा
करण्यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता अर्थसहाय्य (कार्यक्रम)
३३, अर्थसहाय्य ( २४०१ ८२०८)

३. कृषि आयुक्तालय स्तरावर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांच्या मर्यादेत/P.W.D/मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार/ प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाचा दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णया सोबतच्या परिशिष्टातील अनु क्र.९ येथील अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१०१६०६४६५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH RAWOO KADAM

Digitally signed by PRAKASH RAWOO KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, pseudonym=22C98915B0D57E8A4AE6BA33EC226C3725655E71, serialNumber=71172C5D9D385E975252C0585193200575D0F23122741AD16703141150CC4876, cn=PRAKASH RAWOO KADAM
Date: 2022.03.10 16:08:18 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ को- ऑप मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
८. कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी

१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई
१४.वित्त विभाग (व्यय-१ व २, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१५.उप संचालक (खते), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

कक्ष अधिकारी २-अे, कृषि व पदुम विभाग यांना विंनती की, वरील निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) वर कृषि आयुक्तालय, पूणे यांना उपलब्ध करुन द्यावा.

१८. १७-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती )